पदनिर्मिती, पदभरती व पदांचे पुनरुज्जीवन याबाबतचे निर्बंध व अनुषंगिक आढावे- तांत्रिक बाबींसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याच्या तरतुदीत सुधारणा करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/आ.पु.क.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २७ जानेवारी, २०१७.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि. १० सप्टेंबर,२००१.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.असंक १००१/प्र.क्र.२९(भाग २),वित्तीय सुधारणा, दि. २६ फेब्रुवारी,२००२.

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०११/प्र.क्र.१८५/११/वित्तीय सुधारणा-१, दि. २६ ऑगस्ट,२०११.

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दि. ११ जुलै, २०१२.

५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि. २० फेब्रुवारी, २०१६.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ क्र.(३) येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार तांत्रिक कारणांसाठी विशिष्ट कालावधीकरिता निर्माण करावयाच्या अधिसंख्य पदांच्या निर्मितीस वित्त विभागाची व त्यानंतर मा.मुख्य सचिवांची मान्यता घेणे बंधनकारक करण्यात आले होते. त्यामध्ये सुधारणा करुन वरील संदर्भ क्र.(४) येथील शासन निर्णयानुसार, त्या शासन निर्णयात नमूद काही पदांसाठी अधिसंख्य पद निर्मितीचे अधिकार सबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले होते. तर परिविक्षाधीन / प्रशिक्षणार्थी उमेदवारांना त्यांचे वेतन व भत्ते मिळण्यास अडचण होत असल्याने वरील संदर्भ क्र. (५) येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा / केंद्रीय लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांचा विहीत परिविक्षा कालावधी / प्रशिक्षण कालावधी या तांत्रिक कारणासाठी विशिष्ट कालावधीकरिता निर्माण करावयाच्या अधिसंख्य पदांच्या निर्मितीचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागांना देण्यात आले. तथापि, सदर शासन निर्णयामध्ये स्टाफ सिलेक्शन कमिशन पुरस्कृत उमेदवारांचा समावेश नसल्याने सदरहू परिविक्षाधीन/प्रशिक्षणार्थी उमेदवारांना त्यांचे वेतन व भत्ते मिळण्यास अडचणी येत असल्याचे निदर्शनास आले आहे. सदर वस्तुस्थिती विचारात घेऊन शासन निर्णय दि. २०/०२/२०१६ मधील पुन:सुधारित उपपरिच्छेद ४.१० मध्ये स्टाफ सिलेक्शन कमिशन पुरस्कृत उमेदवारांचा समावेश करण्याची बाब विचाराधीन होती. तद्नुसार शासनाने सदर शासन निर्णयात आता खालीलप्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि. २० फेब्रुवारी, २०१६ अन्वये समाविष्ट करण्यात आलेल्या पुन:सुधारित उपपरिच्छेद क्र.४.१० मध्ये स्टाफ सिलेक्शन कमिशन द्वारा नियुक्त उमेदवारांचा समावेश करुन आता पुन:सुधारित उपपरिच्छेद क्र.४.१० खालीलप्रमाणे वाचण्यात यावा.

**पुन:सुधारित उपपरिच्छेद :**

४.१० - "महाराष्ट्र लोकसेवा आयोग/ केंद्रीय लोकसेवा आयोग तसेच स्टाफ सिलेक्शन कमिशन पुरस्कृत उमेदवारांचा विहीत परिविक्षा कालावधी / प्रशिक्षण कालावधी या तांत्रिक कारणासाठी विशिष्ट कालावधीकरिता निर्माण करावयाच्या अधिसंख्य पदांच्या निर्मितीचे अधिकार यापुढे संबंधित प्रशासकीय विभागांना राहतील. तथापि, प्रशिक्षणासाठी हजर झालेल्या उमेदवारांइतकीच अधिसंख्य पदे निर्माण करणे व अधिसंख्य पद निर्मितीच्या आदेशात प्रशिक्षण कालावधी समाप्त झाल्याच्या दिनांका नंतरच्या दिनांकास अधिसंख्य पदे आपोआप संपुष्टात येतील असे नमूद करणे विभागास बंधनकारक राहील."

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०१२७१६३०५८९३०५ असा आहे. हा संदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yashwant Dattatraya Deshkar

Digitally signed by Yashwant Dattatraya Deshkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a5225b73692fe5cc84da9c6e5a81f64b5ea3b3480f6bc59563e396367311f8, cn=Yashwant Dattatraya Deshkar
Date: 2017.01.27 16:30:52 +05'30'

**( य.द.देशकर )**
उप सचिव , महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३. सर्व विधान सभा / विधान परिषद सदस्य.
४. मा.विरोधी पक्षनेता महाराष्ट्र विधान सभा/ विधान परिषद सदस्य.
५. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक.
६. मंत्रालयीन सर्व प्रशासकीय विभाग.
७. सर्व उप सचिव / सह सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. मंत्रालयाच्या सर्व विभागाखाली विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख.
९. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
१०. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
११. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१२. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१३. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१.

१६. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
१७. सर्व विभागीय आयुक्त.
१८. सर्व जिल्हाधिकारी.
१९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२०. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
२२. प्रधान महालेखापाल-१(लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२३. प्रधान महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
२४. महालेखापाल-१(लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२५. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
२६. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
२७. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
२८. महालेखापाल (लेखापरीक्षा) III, महाराष्ट्र, मुंबई.
२९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
३०. संचालक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
३१. सह संचालक (सुधारणा), लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई.
३२. सह संचालक, लेखा व कोषागारे, नवी मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/अमरावती.
३३. सह संचालक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/अमरावती.
३४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३६. सर्व उप कोषागार अधिकारी.
३७. जिल्हा लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा.
३८. सर्व जिल्हा कोषागार अधिकरी.
३९. सर्व लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद.
४०. सहकार व वस्त्रोद्योग विभाग (कार्या. हाऊसिंग सेल १९ सी), मंत्रालय, मुंबई.
४१. सर्व राजकीय पक्षांची कार्यालये.
४२. वित्त विभागातील सर्व कार्यासने.
४३. निवड नस्ती, आकृतीबंध पुनर्रचना कक्ष.